**आदिवासी सेवक/ सेवा संस्था यांना पुरस्कार देण्याकरिता स्थापन केलेल्या निवड समितीची पुनर्रचना करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. आसेपु-०१२३/प्र.क्र.३७/का.१४**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २२ फेब्रुवारी, २०२३

वाचा :- १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-१०९९/प्र.क्र.१५९/ का.५. दि. ५ नोव्हेंबर, १९९९.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२००३/प्र.क्र.५६/का.१४, दि. १९ जानेवारी, २००४.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु- २००५/प्र.क्र.०१/का.१४, दि.७ जानेवारी, २००५.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२००५/प्र.क्र.०१/का.१४, दि.३१ ऑक्टोबर, २००५.
५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२०१०/प्र.क्र.४/का.१४, दि. ११ ऑक्टोबर, २०१०.
६) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२०१२/प्र.क्र.२०९/का.१४. दि. १८ नोव्हेंबर, २०१३.
७) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२०१४/प्र.क्र. ११९/का.१४, दि. १८ जून, २०१५.
८) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. आसेपु-२०२१/प्र.क्र. ३७/का.१४, दि. २३ मार्च, २०२१.
९) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांची दिनांक १८.०७.२०२२ रोजीची टिप्पणी

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात आदिवासींच्या सर्वांगीण विकासासाठी सातत्याने काम करणाऱ्या कार्यकर्त्यांना व स्वयंसेवी संस्थांना प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने आदिवासी विकास विभागामार्फत "आदिवासी सेवक” व "आदिवासी सेवा संस्था" हा पुरस्कार दिला जातो. हा पुरस्कार देण्यासाठी योग्य उमेदवारांची / संस्थाची निवड करण्यासाठी मा. मंत्री (आ.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन अ.क्र. (१) येथील शासन निर्णयाव्दारे राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात यावी, अशी तरतूद आहे. सदर तरतुदीनुसार संदर्भाधीन अ.क्र. (८) येथील शासन निर्णयान्वये ३ वर्षासाठी समिती गठीत करण्यात आली होती. दरम्यान संदर्भाधीन अ.क्र. (९) मधील टिप्पणीन्वये प्राप्त सूचनेनुसार दिनांक २३ मार्च, २०२१ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेली विद्यमान निवड समितीची पुनर्रचना करून नवनियुक्त विधानसभा सदस्यांचा समावेश करून नव्याने समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता सदर समितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

"आदिवासी सेवक" व "आदिवासी सेवा संस्था" हा पुरस्कार देण्याकरिता राज्यस्तरीय निवड समितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | सभासदांचे नांव /पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | मा.मंत्री (आदिवासी विकास) | अध्यक्ष |
| २. | मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) | उपाध्यक्ष |
| ३. | श्री. दिलीप मंगळू बोरसे, मा. विधानसभा सदस्य | सदस्य |
| ४. | श्री. श्रीनिवास चिंतामण वनगा, मा. विधानसभा सदस्य | सदस्य |
| ५. | अ.मु.सचिव (आदिवासी विकास) | सदस्य |
| ६. | आयुक्त (आदिवासी विकास), नाशिक | सदस्य सचिव |

२. या समितीचा कालावधी पुढील दोन वर्षासाठी राहील.

३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक या कार्यालयाकडे पुरस्कारासाठी प्राप्त झालेले प्रस्ताव उपरोक्त समितीच्या मंजुरीसाठी सादर करतील.

४. सदर समितीच्या सदस्यांना प्रचलित नियमानुसार प्रवासभत्ता अनुज्ञेय राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२२१२५४०९२४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरी साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CE18732734BA0742D7712775E8F0AD400558E8748375399762FD447C3E9AC1EB, cn=SATISH VITHALRAO KOVE
Date: 2023.02.22 12:58:21 +05'30'

**(सतीश कोवे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
३. सर्व संसद सदस्य
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा/विधान परिषद

५. सर्व मा. विधान सभा/विधान परिषद सदस्य

६. श्री. दिलीप मंगळू बोरसे, मा. विधानसभा सदस्य, नाशिक

७. श्री. श्रीनिवास चिंतामण वनगा, मा. विधानसभा सदस्य, पालघर

८. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

९. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१०. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

११. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे

१२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर, अमरावती

१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक

१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

१५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.

१६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय

१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई

१९. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक

२०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई

२१. सर्व उपसचिव / अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२२. निवड नस्ती (का.१४), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.